महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य अकादमीचा
राष्ट्रीय कृत बँकेत खाता उघडण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : पंसाअ २०२०/ (प्र.क्र.१०)/ पंजाबी अकादमी/का.५**
जुने जकात घर, डी.डी. बिल्डींग, शहिद भगतसिंह मार्ग,
फोर्ट , मुंबई - ४०० ००१.
दिनांक:- १७/११/२०२०

**संदर्भ :-**

१. अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक : पंजास-२०१७/प्र.क्र. १७६/का-४ दिनांक ५/१०/२०१८
२. वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक संकीर्ण २०२०/ प्र.क्र. ५१/२०/को प्र.शा ५, दि. १३/३/२०२०

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्यात पंजाबी भाषेचा विकास, संवर्धन, प्रगती व्हावी तसेच पंजाबी मराठी व पंजाबी भाषेतील साहित्यिकांमध्ये वैचारिक आदान प्रदान होवून राष्ट्रीय एकात्मतेची भावना दृढ होण्यासाठी महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य अकादमीची स्थापना उपरोक्त संदर्भ क्र.१, दि.५/१०/२०१८ च्या शासन निणर्यान्वये करण्यात आली आहे. तसेच अकादमीमार्फत राबविण्यात यावयाच्या विविध योजनांना मान्यता देण्यात आली आहे. नव्याने निर्माण करण्यात आलेल्या महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य अकादमीच्या कर्मचा-याच्या वेतन (रु.११,८०,०००/-) कार्यालयीन खर्च (रु.५,००,०००/-) व अकादमीमार्फत राबविण्यात येणा-या विविध योजनांसाठी (रु.३०,००,०००/-) त्या त्या लेखाशीर्षाखाली अनुदान मंजूर करण्यात आले आहे. महाराष्ट्र राज्य पंजाबी अकादमीमार्फत राबविण्यात येणा-या विविध योजनांची अंमलबजावणी इ-कुबेरमार्फत करण्यासाठी महाराष्ट्र राज्य पंजाबी अकादमीकरिता राष्ट्रीकृत बँकेत चालू खाते उघडण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य अकादमीमार्फत राबविण्यात येणाऱ्या विविध योजनांची अमंलबजावणी करण्यासाठी शासनाकडून त्या त्या लेखाशीर्षाखाली वितरीत केलेले अनुदान/निधी जमा करण्यासाठी “आहरण व संवितरण अधिकारी महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य अकादमी” या नावाने राष्ट्रीकृत बँकेत चालू खाते उघडण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरची मान्यता पुढील अटी व शर्तीच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

१) आहरण व संवितरण अधिकारी, महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य अकादमी, यांच्या नावाने उघडण्यात आलेल्या चालू खात्यातील रकमेचा वापर केवळ अकादमीमार्फत राबविण्यात येणा-या विविध योजनांवरील कार्यक्रमाच्या अंमलबजावणीकरीता तसेच आस्थापनेवरील खर्चासाठी करण्यात यावा.
२) सदर बँक खात्यातील अखर्चित रकमा शासनाकडे समायोजित करणे आवश्यक राहील.

३) सदर बँक खात्यातील व्यवहारांचे मासिक/तिमाही ताळमेळ करणे तसेच लेखा परिक्षण करणे आवश्यक राहील.

४) सदर बँक खाते बंद करण्यात आल्यास, त्यामधील शिल्लक रकमेचा ताळमेळ घेऊन शिल्लक अखर्चित रक्कम योग्य त्या शासन लेखाशिर्षाखाली तात्काळ जमा करावी.

**३.** सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१५५/२० कोषा प्रशा-५ दि.२६/६/२०२० अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याच्या संगणक संकेताक २०२०१११७१६०८०६९४१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahesh Sadashiv Choukekar

Digitally signed by Mahesh Sadashiv Choukekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Miniorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=965737dc18a2c1fbaf047c7a9f61259e5c65db981c8eaaab6c983897e5318874, cn=Mahesh Sadashiv Choukekar
Date: 2020.11.17 16:10:08 +05'30'

**( म. स. चौकेकर )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. महालेखापाल १/२ (लेखापरिक्षा), लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १, मुंबई/नागपूर
२. संचालक, लेखा व कोषागारे (संगणक कक्ष), नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालय, मुंबई
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४. सह सचिव, अल्पसंखांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५. अवर सचिव/ कक्ष अधिकारी, (का-५) अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अवर सचिव (का-७)/(का-२) अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई (२ प्रतीत)
७. क.अ. कोशाप्र. ५ वित्त विभाग मंत्रालय मुंबई ३२
८. खाजगी सचिव, मा. मंत्री/ मा. राज्यमंत्री, अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
९. कार्याध्यक्ष, महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य अकादमी, मुंबई (अकादमीच्या कार्यालयामार्फत)
१०.अधिक्षक-नि-कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य अकादमी, मुंबई
११.अ.मु.स.यांचे स्वीय सहायक, अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.निवड नस्ती (महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमी, मुंबई.